परिविक्षाधीन कालावधी समाप्त करण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
उच्च व तंत्र शिक्षण विभाग
शासन आदेश क्रमांकः परिवि-२०२०/ प्र.क्र.(८०/२०)/तांशि-१
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक:- ०३ सप्टेंबर,२०२०

संदर्भ :- १. शासन निर्णय, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, उवतंशि/तांशि-१/३३/११/११८/१३, दि. २४/१०/२०१६ .
२. शासन निर्णय, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, उवतंशि/तांशि-१/३३/११/११८/१३, दि.११/०८/२०१७.
३. शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र.परिवी-२७१५/प्र.क्र.३०२/आठ, दि.२९/०२/२०१६
४. संचालक, तंत्रशिक्षण यांचे पत्र क्र. ४/आस्था/परिविक्षा/२०२०/१२९, दि.२०/०२/२०२०.

शासन आदेश -:

उपरोक्त संदर्भाधीन क्र.१ येथील शासन निर्णयान्वये श्री.प्रशांत देशमुख यांची सहयोगी प्राध्यापक,अणुविद्युत व दूरसंदेशवहन अभियांत्रिकी,शासकीय अभियांत्रिकी महाविद्यालय या पदावर शासकीय अभियांत्रिकी महाविद्यालय,चंद्रपूर येथे दोन वर्षाच्या परिविक्षाधीन कालावधीकरीता नियुक्ती करण्यात आली होती. तथापि सदर नियुक्तीच्या ठिकाणी ते रुजू झाले नाहीत. तदनंतर त्यांच्या सदर नियुक्तीत अंशत: बदल करून त्यांची पदस्थापना शासकीय अभियांत्रिकी महाविद्यालय,नागपूर येथे संदर्भाधीन क्र.२ येथील शासन निर्णयान्वये करण्यात आली. श्री.प्रशांत देशमुख यांचा सदर पदावरील परिविक्षाधीन कालावधी पूर्ण झाल्याने त्यांचा परिविक्षाधीन कालावधी समाप्त करण्याबाबतचा प्रस्ताव संदर्भ क्र. ४ येथील पत्रान्वये प्राप्त झाला आहे.

२. शासन सेवेतील अधिकारी / कर्मचारी यांचा परिविक्षाधीन कालावधी समाप्त करण्यासंदर्भातील संदर्भाधीन क्र.३ येथील शासन निर्णयातील अटींची पूर्तता श्री.प्रशांत देशमुख यांचे प्रकरणी होत असल्याने त्यांचा परिविक्षाधीन कालावधी खालील तक्त्यात स्तंभ ०५ मध्ये नमूद दिनांकास समाप्त करण्यात येत आहे. तसेच त्यांची सेवा नियमितपणे पुढे चालू ठेवण्याचा दिनांक स्तंभ ०६ मध्ये नमूद करण्यात येत आहे.

| अ. क्र | अधिका-याचे नाव व पदनाम | रुजू दिनांक | परिविक्षाधीन कालावधीत घेतलेल्या रजा | परिविक्षाधीन कालावधी समाप्तीचा दिनांक | सेवा नियमितपणे पुढे चालू ठेवण्याचा दिनांक |
|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| १. | श्री.प्रशांत देशमुख, सहयोगी प्राध्यापक, अणुविद्युत व दूरसंदेशवहन अभियांत्रिकी, शासकीय अभियांत्रिकी महाविद्यालय,नागपूर | ०१/०९/२०१७ (म.पू.) | निरंक | दि.३१/०८/२०१९ (म.नं.) | दि.०१/०९/२०१९ (म.पू.) |

३. सदर शासन आदेश, सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र. परिवि-२७१५/ प्र.क्र.३०२/ आठ, दि. २९.०२.२०१६ मधील तरतुदींन्वये व सामान्य प्रशासन विभाग,शासन निर्णय क्र.परिवि/२७ १५/प्र.क्र.२०३/आठ,दि.२५.०८.२०१५ अन्वये प्रशासकीय विभाग प्रमुखास प्रदान केलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२००९०३१४५४२६६६०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sameer Laxman Dhere

Digitally signed by Sameer Laxman Dhere
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Higher and Technical Education Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=e6ab4a357b0e2247b4328b57f45f509bf1bf0bd20c865128a018421c354bddc5, serialNumber=6ee64cf9b42881125c3715a5db341b5827c5743c728bc85f04bb71ff8fc154d6, cn=Sameer Laxman Dhere
Date: 2020.09.03 14:55:48 +05'30'

**( समीर ढेरे )**

**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

श्री.प्रशांत देशमुख, सहयोगी प्राध्यापक,अणुविद्युत व दूरसंदेशवहन अभियांत्रिकी, शासकीय अभियांत्रिकी महाविद्यालय,नागपूर (संचालक,तंत्रशिक्षण यांचेमार्फत).

**प्रत,**

१. संचालक, तंत्र शिक्षण, तंत्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२. सहसंचालक ,तंत्रशिक्षण विभागीय कार्यालय,नागपूर.
३. प्राचार्य, शासकीय अभियांत्रिकी महाविद्यालय,नागपूर.
४. महालेखापाल(लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा),महाराष्ट्र-२,नागपूर.
५. अपर मुख्य सचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
६. निवड नस्ती (तांशि-१).